**मौजा बाबुलखेड़ा, मौजा अजनी इम्प्रेस मिल को. ऑप. हा. सो. लि. येथील सुमारे १०५४.८० चौ.मी. जागेवर अखिल भारतीय ओबीसी भवन बांधण्याकरीता रु.३७.३२८ कोटी इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**शासन निर्णय क्रमांक-नासुप्र-१६२४/प्र.क्र.४०/नवि-२६**

**नगर विकास विभाग,**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- १६ मार्च, २०२४.

**वाचा :-** (१) नागपूर सुधार प्रन्यास विश्वस्त मंडळाचा ठराव क्र.५/१२१३, दि.१२ फेब्रुवारी, २०२४

(२) सभापती, नागपूर सुधार प्रन्यास यांचे पत्र क्र.सं.वि./२६९०, दि.२९ फेब्रुवारी, २०२४.

(३) महाव्यवस्थापक, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर यांचे पत्र क्र.वि.अ.(दक्षिण)/३१५०, दि.१२ मार्च, २०२४.

**प्रस्तावना:-**

नागपूर सुधार प्रन्यास विश्वस्त मंडळाच्या ठराव क्र.५/१२१३, दि.१२ फेब्रुवारी, २०२४ अन्वये प्राप्त मान्यतेच्या अनुषंगाने संदर्भाधीन क्र.३ अन्वये महाव्यवस्थापक, नागपूर सुधार प्रन्यास यांनी मौजा बाबुलखेड़ा ख.क्र. ५७/२, ५८/२५ व ख.क्र १२२, मौजा अजनी इम्प्रेस मिल को. ऑप. हा. सो. लि. येथील सुमारे १०५४.८० चौ.मी. जागेवर अखिल भारतीय ओबीसी भवन बांधण्याकरीता रु.३७.३२८ कोटी इतक्या किंमतीच्या नागपूर सुधार प्रन्यासद्वारे तयार करण्यात आलेल्या अंदाजपत्रकातील कामांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत प्रस्ताव सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

अखिल भारतीय ओबीसी महासंघ यांच्या मागणीनुसार मौजा बाबुलखेड़ा ख.क्र. ५७/२, ५८/२५ व ख.क्र १२२, मौजा अजनी इम्प्रेस मिल को. ऑप. हा. सो. लि. येथील सुमारे १०५४.८० चौ.मी. जागेवर अखिल भारतीय ओबीसी भवन बांधण्याकरीता नागपूर सुधार प्रन्यासद्वारे तयार करण्यात आलेल्या अंदाजपत्रकात नमूद रु.३७.३२८ कोटी इतक्या किंमतीच्या कामांना पुढील अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

i. शासनाने दिनांक १० सप्टेंबर, २००१ रोजी मंजूरी दिलेल्या सुधारीत विकास योजनेनुसार खसरा क्रमांक ५७/२, ५८/२५, मौजा बाबुलखेडा खसरा क्रमांक १२२, मौजा अजनी एम्प्रेस मिल को. ऑप. हाऊ. सोसायटी लि. च्या अभिन्यासातील जागा “फायर स्टेशन (एमएस-२६)” या आरक्षणाने प्रस्तावित आहे. सदर मागणी केलेली १०५४.८० चौ.मी. जागा फायर स्टेशन करीता आरक्षित असल्यामुळे आरक्षणाच्या फेरबदलाबाबत महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ च्या कलम ३७ नुसार प्रस्ताव समोचित नियोजन प्राधिकरण नागपूर महानगरपालिका यांना नागपूर सुधार प्रन्यासद्वारे सादर केल्यानंतर त्यास नागपूर महानगरपालिकेने शासनास सादर करून याबाबत मंजूरी प्राप्त करुन घेण्यात यावी.

ii. सदर प्रकल्पाअंतर्गतची कामे ही नागपूर सुधार प्रन्यास च्या प्रस्तावित जमिनीवरच करणे आवश्यक आहे. कामाचे स्वरूप सार्वजनिक असावे, त्यात कुठल्याही खाजगी स्वरुपाच्या कामाचा समावेश करता येणार नाही.

iii. या कामामुळे मा.उच्च न्यायालयात दाखल कोणत्याही न्यायालयीन प्रकरणामध्ये हस्तक्षेप होत नाही अथवा मा.न्यायालयाचा अवमान होत नाही यांची संपुर्ण खात्री करुनच सदर काम हाती घेण्यात यावे. याची सर्व जबाबदारी सभापती, नागपूर सुधार प्रन्यास यांची राहील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२४०३१६१६१७२४७४२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=7b40f543d9d95d4cad6707bb7eae1089289d9878b7cb34418f111566e3223ba1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A94EF1B631F4673B829AC9ADBEB5B0DDABD086A7544E3FDF47CD7A011FF7EA40, cn=VIDYA RAMAPPA HAMPAYYA
Date: 2024.03.16 16:26:52 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा.उपमुख्यमंत्री तथा मंत्री (गृह व विधि व न्याय विभाग) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.उपमुख्यमंत्री तथा मंत्री ( वित्त व नियोजन विभाग) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) प्रधान सचिव (नवि-२) यांचे विशेष कार्य अधिकारी, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५) सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर.
६) निवडनस्ती, कार्यासन नवि-२६.